जातीय दंगलीमध्ये मृत झालेल्या श्री. शेख मोहसिन महंमद सादीक शेख यांच्या वारसांना मदत देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ-२०१५/प्र.क्र.१८३/म-३

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १४ जून, २०१८

<u>वाचा :-</u>

**१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांकः आरएलएफ-११-०३/प्र.क्र.३१०/म-३, दिनांक २४.८.२००४,**
**२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांकः आरएलएफ-१२-०८/प्र.क्र.२९८/म-३, दिनांक १ डिसेंबर, २००८,**
**३) जिल्हाधिकारी, पुणे यांचे पत्र क्रमांकः पगम/कावि/११०७-११४२/२०१७, दिनांक ३०.०५.२०१७.**

<u>प्रस्तावना :-</u>

दिनांक ३१.०५.२०१४ रोजी फेसबुकावर छत्रपती शिवाजी महाराज, संभाजी महाराज व बाळासाहेब ठाकरे यांच्या संदर्भात आक्षेपार्ह मजकूर व चित्र प्रसिध्द झाल्यामुळे उमटलेल्या हिंसक प्रतिक्रियेमध्ये मृत झालेल्या श्री. शेख मोहसिन महंमद सादीक शेख यांच्या वारसांना केंद्र शासनाची योजना व राज्य शासनाची योजना या दोन्ही योजनेअंतर्गत प्रत्येकी रुपये ५ लक्ष याप्रमाणे रुपये १० लक्ष आर्थिक मदत देणे शासनाच्या विचाराधिन होते.

## शासन निर्णय:-

दिनांक ३१.०५.२०१४ रोजी फेसबुकावर छत्रपती शिवाजी महाराज, संभाजी महाराज व बाळासाहेब ठाकरे यांच्या संदर्भात आक्षेपार्ह मजकूर व चित्र प्रसिध्द झाल्यामुळे उमटलेल्या हिंसक प्रतिक्रियेमध्ये मृत झालेल्या श्री. शेख मोहसिन महंमद सादीक शेख हे मृत झाले आहेत. जिल्हाधिकारी, पुणे यांचे संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये जिल्हास्तरीय समितीच्या शिफारशीनुसार श्री. शेख मोहसिन महंमद सादीक शेख यांच्या वारसांना खालील प्रमाणे मदत देण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मृत पावलेल्या व्यक्तीचे नांव | राज्य शासनामार्फत द्यावयाची मदत | केंद्र शासनामार्फत द्यावयाची मदत | एकूणनिधी |
|---|---|---|---|---|
| १) | श्री. शेख मोहसिन महंमद सादीक शेख | रु. ५ लक्ष | रु. ५ लक्ष | रु. १० लक्ष |

२.  जिल्हाधिकारी, पुणे यांना रु. १० लक्ष (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) इतका निधी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षामध्ये अर्थसंकल्पीय तरतूदीन्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक सी-५,
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,
६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याणकार्यक्रम,
२०० इतर कार्यक्रम,
(०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य,
(०१)(०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य,
(२२३५०३४७),
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)(दत्तमत्त)

३.  सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) वर जिल्हाधिकारी, पुणे यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधीचे वितरण संबंधित मृत व्यक्तीच्या वारसांना करण्यात यावे. वरील मृत व्यक्तीच्या वारसामध्ये काही बदल घडून आल्यास त्याची खातरजमा जिल्हाधिकारी, पुणे यांनी करावी. संबंधित योग्य वारसास तातडीने रक्कम अदा करण्याची कार्यवाही करुन उपयोगिता प्रमाणपत्रासह अहवाल शासनास सादर करावा.

४.  केंद्र शासनाकडून सदर रकमेची प्रतिपूर्ती करण्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादरकरण्यात यावी. तसेच पुढील प्रमाणे वाटपाबाबतची माहिती कळविण्यात यावी.

| No. | Name of deceased | Details (Name & address of NOK) | Sanction disbursed | Amount disbursed | Details of disbursement (Cheque No. & Date) |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

५.  सदर निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे/नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार आहरीत व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्याच्या सूचना देण्यात याव्यात. वर्ष अखेरीस संपूर्णपणे प्रमाणित विनियोजन लेखे या विभागाकडे सादर करण्याची दक्षताही नियंत्रण अधिकाऱ्यांनी घ्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१४१२१२४८८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2018.06.14 12:13:01 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२. जिल्हाधिकारी, पुणे,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
४. महालेखापाल-१/२ (लेखाव अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
६. वित्त विभाग (अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-४/अर्थसंकल्प-६/व्यय-०९), मंत्रालय, मुंबई,
७. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती (कार्यासन-०३), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत माहितीसाठी :-**

१) मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीयसहायक,
२) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.